सायबर सुरक्षा प्रकल्पासाठी दि. २०सप्टेंबर, २०२३ ते ३१ डिसेंबर, २०२३ पर्यंतच्या कालावधीतील एकूण ०३ सल्लागारांच्या मानधनापोटी रू.४७,०३,६३७/- इतका निधी मे. प्राईसवॉटर हाऊसकुपर्स प्रा.लि. मुंबई या कंपनीस अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-०१२४/प्र.क्र.९/विशा-३(अ)**

**मंत्रालय,मुंबई-४०००३२**

**तारीख: २८ मार्च, २०२५**

**संदर्भ :-**

१. अपर पोलीस महासंचालक (नि व स), पोलीस महासंचालक यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१/६१६२/सिस्टीम इंटिग्रेटर/प्रकल्प सल्लागार नियुक्ती/ ४८/ २०२२, दि.०२.०६.२०२२
२. उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.०६.१०.२०२२ च्या बैठकीचे इतिवृत्त.
३. माहिती तंत्रज्ञान विभाग शासन निर्णय क्र. GAD-मातंस०८०/ ४२०१४- O/ DIRECTORATE OF DIT (MH), दि.०९.०५.२०१९ व २४.०४.२०२३
४. शासन निर्णय कार्यादेश क्रमांक MISC-०२१८/प्र.क्र.४९/विशा-३(अ) दि.२१.१०.२०२२
५. उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२५.०५.२०२३ च्या बैठकीचे इतिवृत्त.
६. शासन निर्णय कार्यादेश क्रमांक MISC-०२१८/प्र.क्र.४९/विशा-३(अ) दि.१६.०६.२०२३
७. शासन निर्णय समक्रमांक दि.०८.०२.२०२४
८. पोलीस अधीक्षक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई यांचे पत्र क्र.विपोमनि/ सायबर/ १४३८/ २०२५, दि.२५.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन पत्र क्र. १ अन्वये विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई यांनी महाराष्ट्र सायबर सुरक्षा प्रकल्पासाठी प्रकल्प समन्वयक (SI) नेमण्याकरिता पुर्ननिविदा प्रकिया राबविण्यासाठी प्रकल्प सल्लागार नियुक्ती करण्याबाबत विनंती केली होती. संदर्भ क्र.२ अन्वये उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.०६.१०.२०२२ रोजीच्या बैठकीतील निर्णयान्वये महाराष्ट्र सायबर सुरक्षा प्रकल्पासाठी ०१ वरीष्ठ सल्लागार व ०१ सल्लागार यांची नियुक्ती संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती नुसार करण्याबाबत निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार उपरोक्त संदर्भ क्र.४ अन्वये सदर सल्लागारांना कार्यादेश देण्यात

आले. उपरोक्त संदर्भ क्रमांक ५ अन्वये उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२५.०५.२०२३ रोजीच्या बैठकीतील निर्णयान्वये महाराष्ट्र सायबर सुरक्षा प्रकल्पासाठी ०१ मुख्य सल्लागार व ०२ व्यवस्थापन सल्लागार यांची संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती नुसार नियुक्ती करण्यात आली होती. उपरोक्त संदर्भाधीन क्र. ७ अन्वये सायबर सुरक्षा प्रकल्पासाठी दि.१.०३.२०२३ ते दि.१९.०९.२०२३ पर्यंत नियुक्त केलेल्या एकूण ०५ सल्लागारांचे रू. ७५,०३,३४८/- इतका निधी मानधनापोटी मे.प्राईसवॉटर हाऊसकुपर्स प्रा.लि. मुंबई या कंपनीस अदा करण्यात आला आहे. आता उपरोक्त संदर्भाधीन क्र.८ अन्वये पोलीस अधीक्षक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई यांनी एकूण ०३ सल्लागाराचे दि.१९.०९.२०२३ ते दि.१४.०३.२०२४ पर्यंत कालावधीतील मानधनापोटी रू.८१,२८,८३५/- इतका निधी उपलब्ध करून देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. तथापि, आर्थिक वर्ष २०२४-२५ मधील शिल्लक निधी विचारात घेता सल्लागारांच्या मानधनापोटी इतका निधी रू. ४७,०३,६३७/- महाराष्ट्र राज्य, सायबर कार्यालयास अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

महाराष्ट्र सायबर सुरक्षा प्रकल्पासाठी प्रकल्प समन्वयक (SI) नेमण्याकरिता पुर्निविदा प्रक्रिया राबविण्यासाठी मे.प्राईसवॉटर हाऊसकुपर्स प्रा.लि. मुंबई या कंपनीने पुरवठा केलेल्या ०१ मुख्य सल्लागार, ०१ वरीष्ठ सल्लागार व ०१ सल्लागार यांची नियुक्ती करण्यात आली होती. त्यांनी दि.२० सप्टेंबर, २०२३ ते ३१ डिसेंबर,२०२३ पर्यंत या विहीत कालावधीत Scope of Work मधील अटी व शर्तीनुसार समाधानकारक कामे केली असल्यामुळे मे.प्राईसवॉटर हाऊसकुपर्स प्रा.लि. मुंबई यांना **दि.२० सप्टेंबर, २०२३ ते ३१ डिसेंबर,२०२३ पर्यंतच्या कालावधीतील रू. ४७,०३,६३७/- (अक्षरी रू.सत्तेचाळीस लाख तीन हजार सहाशे सदतीस फक्त) (करासह)** इतका निधी सदर शासन निर्णयान्वये अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.१, २०५५ -पोलीस (००) (१०१) गुन्हे अन्वेषण व दक्षता (००) (०६) सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध (अनिवार्य) (२०५५ A ०२३) १३-कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

३. उपरोक्त निधी खर्च करतांना वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/ अर्थ-३, दि.०१.०४.२०२४ नमूद करण्यात आलेल्या परिच्छेद ५ ते १९ मधील मार्गर्शक सूचना व परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनाचे काटेकोर पालन करावे व वेळोवेळी विहीत विवरणपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

४. सदर निधी आहरित करण्यासाठी अपर पोलीस महासंचालक (सायबर व म.अ.प्र.), महाराष्ट्र राज्य, मुंबई हे “नियंत्रण अधिकारी” तसेच त्यांच्या अधिनस्त कार्यालयाचे वरिष्ठ कार्यालय अधीक्षक/ प्रशासकीय अधिकारी (सायबर व म.अ.प्र.), महाराष्ट्र राज्य, मुंबई हे “आहरण व संवितरण अधिकारी” असतील.

५. सदर निधीचे वितरणाचे आदेश वित्त विभागाच्या दि १७.०३.२०२५.रोजीच्या परिपत्रकास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१४३१४४३६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SWAPNA NILESH DESHPANDE

Digitally signed by SWAPNA NILESH DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=8f33d110713d529fd14cadb7107a7a56252382926dfbbe68e0ce49aae150e1e8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F68C2CBBE864D14D120F29960E8E60D5C00E2D614E6A0234A132D68EADBD05CC, cn=SWAPNA NILESH DESHPANDE
Date: 2025.03.28 14:32:19 +05'30'

**(स्वप्ना देशपांडे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई.
२. सह सचिव (अर्थ-१), गृह विभाग मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. निवडनस्ती/विशा-३(अ), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.